**पुणे येथे ४ अतिरिक्त कौटुंबिक न्यायालये स्थापन करण्याबाबत व त्याकरीता आवश्यक पदे निर्माण करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : कौटुंन्या-१११५/प्र.क्र.७२/का-९**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : ०६ जुलै, २०२३

**वाचा:-**१) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. सीआरसी-४७८५/४५-(९)-अकरा, दि. ०३.०१.९८९

२) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.एफसीपी-१०९४/१०२(७)-का. नऊ,दि. १६.०८.१९९६

३) मा.उच्च न्यायालयाचे पत्र क्र.B(W)A-६८०४ of १९९२/२६२५/३९३९२,दि.०७.१२.२०१९.

४) मा.उच्च न्यायालयाचे पत्र क्र.B (W)A-६८०४ of १९९२/५०/६४५,दि. ०७.०१.२०२२

५) वित्त विभागाच्या दि.३०.१२.२०२२ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.१३.१२.२०२२ रोजीच्या बैठकीचे कार्यवृत्त.

**प्रस्तावना :-**

कौटुंबिक न्यायालय, अधिनियम १९८४ च्या कलम ३ अन्वये मा. उच्च न्यायालयाच्या सहमतीने १० लक्ष किंवा अधिक लोकसंख्या असलेल्या शहरी/नागरी प्रदेशाकरीता कौटुंबिक न्यायालये स्थापन करण्याची तरतुद आहे. त्यानुसार संदर्भ क्र. १ व २ येथील शासन निर्णयान्वये पुणे येथे ५ कौटुंबिक न्यायालये स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर ५ कौटुंबिक न्यायालयांमधील प्रलंबित प्रकरणांची संख्या, तसेच वाढत्या नागरी क्षेत्रामुळे वाढत असलेली कौटुंबिक विवादांची प्रकरणे विचारात घेऊन मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी संदर्भ क्र. ३ व ४ येथील पत्रान्वये पुणे येथे ४ अतिरिक्त कौटुंबिक न्यायालये स्थापन करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला होता.

सदर प्रस्तावास उच्चस्तरीय सचिव समितीने व मा. मंत्रिमंडळाने मान्यता दिली आहे. त्यानुसार पुणे येथे ४ अतिरिक्त कौटुंबिक न्यायालये स्थापन करण्याची व त्यासाठी पदनिर्मिती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पुणे येथे ४ अतिरिक्त कौटुंबिक न्यायालये स्थापन करण्यास व त्याकरीता पुढील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे ३६ नियमित पदे निर्माण करण्यास व १० मनुष्यबळाच्या सेवा बाह्ययंत्राणेव्दारे घेण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजुरी देण्यात येत आहे.

## अ) नियमित पदे

| अ. क्र. | पदाचे नाव | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | न्यायाधीश | (न्यायिक वेतनश्रेणी )<br>जे-५ :१४४८४०-१९४६६० | ४ |
| २ | विवाह समुपदेशक | एस-२० : ५६१००-१७७५०० | ८ |
| ३ | लघुलेखक ग्रेड-१ | एस-१७ : ४७६००-१५११०० | ४ |
| ४ | लघुलेखक ग्रेड-३ | एस-१४ : ३८६००-१२२८०० | ४ |
| ५ | शिरस्तेदार | एस-१३ :३५४००-११२४०० | ४ |
| ६ | सहायक शिरस्तेदार | एस-८ : २५५००-८११०० | ४ |
| ७ | अभिसाक्ष लेखनिक | एस-६ : १९९००-६३२०० | ४ |
| ८ | लिपिक | एस-६ : १९९००-६३२०० | ४ |
| **एकुण नियमित पदे** | | | **३६** |

## आ) बाह्ययंत्रणेव्दारे घ्यावयाच्या सेवा

| अ.क्र. | पदनाम | मनुष्यबळ संख्या |
|---|---|---|
| १ | बहुद्देशीय गट ड कर्मचारी (शिपाई, पहारेकरी, सफाईगार इ.) | ८ |
| २ | वाहनचालक | २ |
| **एकूण मनुष्यबळ** | | १० |

३. बाह्ययंत्रणेव्दारे कामे करुन घेताना वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांचे अनुपालन करण्यात यावे.

४. उपरोक्त नमूद पदे ही भरण्यात आलेल्या दिनांकापासून प्रथमत: दिनांक ३१ ऑगस्ट, २०२३ पर्यंत चालू ठेवण्यास याव्दारे शासन मंजूरी देण्यात येत असून, सदर अस्थायी पदांना दिनांक ३१ ऑगस्ट, २०२३ नंतर पुढील मुदतवाढ घेणे आवश्यक राहील.

५. याकरीता येणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान-१०५ दिवाणी व सत्र न्यायालये-(०१)(०२) प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, सांकेतांक २०१४ ०३४१" या लेखाशीर्षाखालील संबंधित वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय मा. मंत्रिमंडळाच्या दि. १३.०६.२०२३ रोजीच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार तसेच वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौ.सं.क्र.६५७/व्यय-५, दि.३०.०६.२०२३ व अनौ.सं.क्र.१५९/ आ.पु.क. दि.२३.०३.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०७०६१५०८२०६७१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDKISHOR LALLU MORE

Digitally signed by NANDKISHOR LALLU MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=8e6e6ef027afaf311b73f55b93d66802f7572a95024328e2d647f7ef65a9432a, postalCode=400032,
st=Maharashtra,
serialNumber=69426D4C260E75A2AE012E47A93A468B42FD9B82A0B40FBCADEA1F0C509379CC,
cn=NANDKISHOR LALLU MORE
Date: 2023.07.06 15:10:42 +05'30'

**(नंदकिशोर ल. मोरे)**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रतः**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई,
४. मा. महाप्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई,
५. प्रबंधक, उच्च न्यायालय (निरीक्षणे-१), मुंबई,
६. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, पुणे,
७. प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, पुणे,

८. महालेखापाल- एक (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई,

९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,

१०. वित्त विभाग-व्यय-५/आपुक/सेवा-९,

११. विधि व न्याय विभाग कार्यासन-२३,२४,२५,

१२. निवड नस्ती/का.९.